जिल्हा स्तरावर प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटी (SPCA) बाबत जनजागृती करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:- पविआ-२०१४/प्र.क्र.४१४/पदुम-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- २५ सप्टेंबर, २०१८

वाचा :- कृषि व पदुम विभाग, अधिसूचना क्र. पविआ-२०१४/प्र.क्र.४१४/पदुम-३, दिनांक:- १४ मार्च, २०१७.

प्रस्तावना:-

केंद्र शासनाच्या प्राणी क्लेष प्रतिबंधक अधिनियम, १९६० मधील तरतूदींची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी प्राणी क्लेष प्रतिबंधक (प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटी स्थापना व नियमन) नियम, २००१ मधील नियम (३) च्या उपनियम (१) द्वारे प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन, संदर्भाधीन दिनांक १४ मार्च, २०१७ च्या अधिसूचनेद्वारे राज्यातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटी स्थापन करण्यात आली आहे.

२. बाबत जनतेमध्ये जनजागृती करण्यासंदर्भात निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

३. वर नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटी संदर्भात राज्यात जनजागृती करण्यासाठी शासन खालीलप्रमाणे निर्देश देत आहे:-

**(i) हेल्प लाईन जाहीर करणे**

जिल्हाधिकारी कार्यालयातील कार्यरत असलेली हेल्प लाईन वापरण्यात यावी.

**(ii) भिंतीपत्रके लावणे**

जिल्हाधिकारी, जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, पोलीस अधिक्षक, मुख्य कार्यकारी अधिकारी (जि.प.), इत्यादी कार्यालयात भिंतीपत्रके लावणे.

**(iii) शाळा व महाविद्यालयांमध्ये जनजागृतीचे कार्यक्रम आयोजित करणे**

जिल्ह्यातील सर्व शाळा व महाविद्यालयामध्ये जनजागती करण्यासाठी शाळांचे मुख्याध्यापक व महाविद्यालयाचे प्राचार्य यांना निर्देशित करण्यात यावे.

**(iv) पथनाट्याद्वारे जनजाग्रती करणे**

महाविद्यालयातील विद्यार्थ्यांकडून शक्य असल्यास पथनाट्याद्वारे जनजागृती करण्यात यावी.

**(v) ग्रामसभेमध्ये प्रसिध्दी देणे**

जिल्ह्यातील सर्व ग्रामपंचायतीच्या ग्रामसभेच्या विषयसूचीमध्ये SPCA च्या जनजागृतीच्या विषयाचा समावेश करुन, ग्रामसभेत चर्चा घडवून आणावी.

**(vi) वृत्तपत्रातून प्रसिध्दी देणे**

वरील सर्व उपाययोजनांच्या संदर्भात संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांना सुयोग्य होईल, अशा ठिकाणी जाहीर कार्यक्रमाचे आयोजन करुन जनजागृती करावी सतेच किमान स्थानिक वृत्तमानपत्रामध्ये प्रसिध्दी करावी.

**(vii) वेबसाईटवर प्रसिध्दी देणे**

आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे आणि तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटी संदर्भात त्यांच्या वेबसाईटवर प्रसिध्दी द्यावी.

४. वरील सर्व बाबींची अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हा प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटी तसेच जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त तथा सदस्य सचिव, प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटी यांनी तात्काळ कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल आयुक्त पशुसंवर्धन महराष्ट्र राज्य, पुणे व शासनास वेळोवेळी सादर करावा.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०९२५१६३९५४३३०१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2018.09.25 17:21:37 +05'30'

**( विकास तु. कदम )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे.
२. सर्व जिल्हाधिकारी
३. सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जि.प.)
५. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन
६. सर्व उप आयुक्त पशुसंवर्धन
७. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी
८. निवड नस्ती (पदुम-३).